**महाराष्ट्र विधानमंडळाच्या माजी सदस्यांनी त्यांच्या रेल्वे / विमान प्रवास सवलत खर्चाची प्रतिपूर्तीची देयके विहित वेळेत कोषागार <u>कार्यालयास सादर करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५५/दोन,**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- २८ सप्टेंबर, २०१८.

**<u>संदर्भ</u>**:- १) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग, क्र. सुविधा-१०/२०००/२४४/प्र.क्र.६/दोन, दिनांक ८ जून, २०००.
२) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग, क्र. सुविधा-२००८/प्र.क्र.१५/दोन, दिनांक ४ जुलै, २००८.
३) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्र. संकीर्ण -२०१६/प्रक्र. ६३/दोन, दिनांक १५ जून, २०१६.

<u>शासन परिपत्रक</u>

महाराष्ट्र विधानमंडळाच्या माजी सदस्यांना राज्यात व राज्याबाहेर प्रतिवर्षी एकूण ३५,००० कि. मी. इतक्या मर्यादेमध्ये एका सोबत्यासह मोफत रेल्वे प्रवासाची सुविधा अनुज्ञेय असून त्यांना तेवढयाच कि. मी. च्या खर्चाच्या मर्यादेत व इतर विहित अटींच्या अधिनस्त रेल्वेऐवजी विमान प्रवासाची सुविधा अनुज्ञेय आहे. त्यांनी सदरहू प्रवासाची प्रतिपूर्तीची देयके <u>तीन महिन्यांच्या विहित मुदतीतच</u> संबंधित कोषागाराकडे सादर करणे आवश्यक आहे.

२. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, माजी सदस्यांकडून काही प्रकरणी उक्त प्रवासाच्या प्रतिपूर्तीची देयके संबंधित कोषागाराकडे तीन महिन्यांच्या विहित कालावधीत सादर केली जात नाहीत. ब-याचवेळा विलंबाने सादर होणा-या देयकांबाबत, अशा प्रकरणी झालेल्या विलंबाची कारणे समर्थनीय अथवा समर्पक नसतात. त्यामुळे ती नाकारली जातात. काही वेळेस अपवादात्मक परिस्थितीत विलंबाने सादर होणा-या प्रवास खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी वित्त विभागाच्या सहमतीने एक विशेष बाब म्हणून मंजुरी दिली जाते. मात्र बहुतांश प्रकरणात अशी विनंती नाकारण्यातच येते. ही बाब विचारात घेऊन महाराष्ट्र विधानमंडळाच्या सर्व माजी सदस्यांना सूचित करण्यात येते की, उक्त संदर्भात नमूद दिनांक ८ जून, २००० च्या शासन निर्णयातील परिच्छेद २ (क) मधील अटीनुसार, त्यांनी **<u>प्रवास केल्याच्या तारखेपासून तीन महिन्याच्या आतच</u>** प्रतिपूर्तीची मागणी कोषागार कार्यालयास करण्याची दक्षता घ्यावी.

**३.** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८०९२८१२४९४९७०१५ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra
Gajanan
Bhagwat

Digitally signed by Rajendra Gajanan Bhagwat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc7aabd81415b8f5527e47fcdf6cb267b325f7490f2a874918347994ab7f727a, serialNumber=d818186dee70df53c608510c8f5de9e22be5a193d4a6472ca4de45a568dc44a7, cn=Rajendra Gajanan Bhagwat
Date: 2018.09.28 12:55:08 +05'30'

**( राजेन्द्र ग. भागवत )**
**सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-४०००३२.
**(त्यांना विनंती आहे की, प्रस्तुत परिपत्रक सर्व माजी विधानमंडळ सदस्यांच्या कृपया निदर्शनास आणण्यात यावे.)**
२) प्रधान सचिव, वित्त विभाग (व्यय-४) मंत्रालय, मुंबई-४०००३२.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे.
५) कार्यासन दोन (निवड नस्ती).

**प्रत -**

मा. मंत्री (संसदीय कार्य) यांचे विशेष कार्य अधिकारी.